**जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणामध्ये लागू करण्यात आलेल्या अधिकारी व कर्मचारी आकृतीबंधातील पदांना दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०२५/प्र.क्र.१४/योजना-५**

बांधकाम भवन , तळमजला,

२५,मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-४०० ००१.

दिनांक : ०६ मार्च, २०२५.

वाचा :-

१) ग्रा.वि.वि., शासन निर्णय क्र.जिग्राप्र-११२१/प्र.क्र.४३/योजना-५ , दि.०१.०४.२०२२.

२) ग्रा.वि.वि., शासन निर्णय क्र.जिग्राप्र-११२३/प्र.क्र.६२/योजना-५ , दि.१२.०९.२०२४

३) वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०६.०९.२०२४

४) वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५

प्रस्तावना :-

राज्यातील ३४ जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकरीता प्रत्येकी ८ पदे असे एकूण २७२ अस्थायी पदांना विभागाच्या दिनांक १२ सप्टेंबर, २०२४ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०८.२०२४ ते २८.०२.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजुरी देण्यात आलेली होती.

दिनांक ३१.०३.२०२२ रोजीच्या मा. मंत्रीमंडळ बैठकीमध्ये जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन योजना बंद करण्याऐवजी राज्य शासनाकडून १००% राज्य योजना म्हणून पुढील ५ वर्षे म्हणजेच दिनांक ०१.०४.२०२२ ते ३१.०३.२०२७ पर्यंत पूर्वीप्रमाणे सुरु ठेवण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.

तसेच सदर बैठकीमध्ये जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन योजनेकरीता दिनांक ०१ एप्रिल, २०२२ पासून पुर्वीच्या १५ पदांऐवजी ८ पदे निश्चित करण्यात आले असून उर्वरित पदावरील अधिकारी / कर्मचारी यांच्या सेवा त्यांच्या मूळ आस्थापनेवर प्रत्यार्पीत करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. यासंदर्भात दिनांक ०१.०४.२०२२ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. यानुषंगाने जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन योजनेकरीता मंजूर पदांना ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u> :-**

१. वित्त विभागाच्या दिनांक ०३ मार्च, २०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराच्या अधिन राहून परिशिष्ठ-अ मध्ये नमूद केल्यानुसार प्रत्येक जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकरीता ८ पदे असे एकूण २७२ पदांना दिनांक ०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर पदांच्या वेतन व भत्ते यांचा खर्च ग्राम विकास विभाग मागणी क्र.एल-३, २५१५- इतर ग्रामीण विकास कार्यक्रम,००-१०४- जिल्हा ग्रामीण विकास अभिकरण-प्रशासन (००)(०१)-जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासकीय खर्च २५१५ २६०१ (१००% राज्य पुरस्कृत) (कार्यक्रम) ३६-सहायक अनुदाने (वेतन) या लेखाशीर्षाखाली सन २०२५-२६ च्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/ आ.पु.क., दिनांक ०३ मार्च,२०२५ अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०२५०३०६१४१५१२३२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANGEETA GOVIND LANDE

Digitally signed by SANGEETA GOVIND LANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=73d2cd74e0a5b700a8275fcc38c24a2cead4ff61075555472916234d2388715f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=551A2C65FB84CF7CD639C3A2366F1CDC5A13691B2367C2D01195826E7A94A449, cn=SANGEETA GOVIND LANDE
Date: 2025.03.06 15:49:36 +05'30'

**( संगिता गो.लांडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
२) महालेखापाल (लेखापरिक्षा) व (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१,मुंबई.
३) महालेखापाल (लेखापरिक्षा) व (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२,नागपूर.
४) संचालक, लेखा व कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) संचालक, निवासी व लेखा कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) मु.का.अ., जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जि.ग्रा.वि.यं.(सर्व).
७) उप आयुक्त, (विकास) विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)

८) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व).
९) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
१०) मुख्य लेखापरिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
११) वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई.
१२) वरिष्ठ लेखाधिकारी, शासनस्तर अंतर्गत लेखा परिक्षण पथक, बांधकाम भवन, मुंबई-०१
१३) निवडनस्ती (कार्यासन योजना-५).

## परिशिष्ट-अ

### जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमधील खालील नमूद केलेल्या पदांना मुदतवाढ

**( मुदतवाढीचा कालावधी दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५)**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | प्रकल्प संचालक (अति. मुख्य कार्यकारी अधिकारी संवर्ग) | १ |
| २ | सहायक प्रकल्प अधिकारी (म.वि.से.वर्ग-२) | १ |
| ३ | सहायक लेखाधिकारी वर्ग - ३ | १ |
| ४ | कार्यालय अधिक्षक | १ |
| ५ | कनिष्ठ अभियंता / शाखा अभियंता | १ |
| ६ | विस्तार अधिकारी | १ |
| ७ | वरिष्ठ सहायक | १ |
| ८ | लिपिक टंकलेखक ( कनिष्ठ सहायक ) | १ |
| **एकूण** | | ८ |